सन २०१३-१४ च्या टंचाई कालावधीसाठी
अंबेजोगाई शहर नगरपरिषदेच्या (ब वर्ग)
(जिल्हा बीड) येथील पिण्याच्या पाण्याच्या
टंचाई निवारण कार्यक्रमांतर्गत घेण्यात
आलेल्या तातडीच्या पाणी पुरवठा योजनेस
निधी उपलब्ध करुन देण्याबाबत .

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१४/प्र.क्र.५२/पापु १४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: १० नोव्हेंबर, २०१४

वाचा :-

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. टंचाई २०९९/प्र.क्र.१४/पापु १४, दिनांक २१ ऑगस्ट, २००९.
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. टंचाई २०१४/प्र.क्र.०१/पापु १४, दिनांक २० फेब्रुवारी, २०१४.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक एससीवाय -०५/२०१४/प्र.क्र. ५८/म-११, दिनांक ५.७.२०१४
४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्र.जा.क्र.२०१४/मशाका/का-२/नैआ १/कावि-दिनांक १० जुलै, २०१४
५) जिल्हाधिकारी, बीड यांचे पत्र क्र. २०१४/जिबी/डेस्क-१/एमयुएन-१५७०, दिनांक १७ जून, २०१४.
६) मुख्याधिकारी, न.प. अंबेजोगाई यांचे पत्र क्र. १०३२३, दिनांक १० ऑक्टोबर, २०१४.

प्रस्तावना :-

सन २०१३-१४ च्या टंचाई कालावधीत, अंबेजोगाई नगरपरिषद (जिल्हा बीड) क्षेत्रात निर्माण झालेल्या पिण्याच्या पाणी टंचाई निवारणासाठी काळविट साठवण तलाव व जोगाईवाडी साठवण तलावातून तातडीची पाणी पुरवठा योजना घेण्याच्या रु. ३४०.८८ लक्ष किंमतीच्या प्रस्तावास संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

सदर योजना टंचाई कालावधीत कार्यान्वित करण्यात आलेली असून शहरास सद्यस्थितीतही या योजनेद्वारे पाणी पुरवठा करण्यात येत आहे. सदर योजनेस लोकवर्गणी वजा जाता उर्वरित ९०% म्हणजेच रु. ३०६.७९ लक्ष इतके अनुदान वितरित करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

अंबेजोगाई शहर नागरी क्षेत्रात निर्माण झालेल्या पिण्याच्या पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या रु. ३४०.८८ लक्ष किंमतीच्या तातडीच्या पाणी पुरवठा योजनेस संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे रु. ३०६.७९ लक्ष इतका निधी विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचेकडे सदर शासन निर्णयात नमूद केलेल्या अटींच्या व खालील नमूद अटींच्या अधीन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

१) या योजनेसाठी शासनाकडून एकूण रु.३४०.८८ लक्ष खर्चाच्या ९० टक्के म्हणजेच रु. ३०६.७९ लक्ष इतके अनुदान उपलब्ध करून देण्यात येईल. उर्वरित १० टक्के म्हणजेच रु. ३४.०९ लक्ष इतकी रक्कम अंबेजोगाई नगरपरिषदेने लोकवर्गणीच्या रुपाने भरावी.

२) जिल्हाधिकारी, बीड यांनी सदर योजनेचे काम गुणवत्तापूर्ण रितीने केले असल्याची खातरजमा करुन निधी वितरित करावा.

३) शहरातील पाणी पुरवठ्याबाबत स्वतंत्र यंत्रणेमार्फत पाणी लेखापरिक्षण करण्यात यावे.

४) या योजनेच्या देखभाल व दुरुस्ती व व्यवस्थापनाची जबाबदारी अंबेजोगाई नगरपरिषदेची राहील.

५) विभागीय आयुक्तांकडे सोपविलेल्या निधीचा विनियोग करतांना सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे त्याचा त्याच प्रयोजनासाठी वापर होत आहे तसेच निधीचे वाटप करतांना संबंधित कामासाठी पूर्वी निधी वितरित करण्यात आला नाही याची खातरजमा विभागीय आयुक्त यांनी करावी. तसेच ज्या प्रयोजनासाठी निधी वितरित करण्यात आला आहे, त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती विभागीय आयुक्त यांनी शासनाकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरित करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाची माहिती पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या शासनास सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहित प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता नियंत्रक अधिकाऱ्याने घ्यावी. वितरित करण्यात आलेल्या अनुदानातून

जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

६) याबाबतचा खर्च "मागणी क्र. सी-६, २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१ - अवर्षण, १०२ - पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९१ - राज्य आपत्ती प्रतिसादर निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (२२४५००९३) (दत्तमत) (वेतनेत्तर)-३१, सहाय्यक अनुदाने" या उपलेखाशीर्षामध्ये भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

७) आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उपकोषागार अधिकारी यांजकडे पाठविण्यात येणाऱ्या व बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या कॉम्प्युटर स्लीपमध्ये गौण/उपलेखाशिर्षाचा संगणक सांकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच कोषागारातून/उपकोषागारातून आहरीत केलेल्या रक्कमेचा अहवाल शासनास सादर करावा.

८) वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३७४/२०१४/व्यय-९ दिनांक ०५.०७.२०१४ अन्वये संदर्भ क्र. ३ द्वारे वितरित केलेल्या निधीतून पुनर्विनियोजनाद्वारे सदर निधी उपलब्ध करुन देण्याकरिता हे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११०१५२४०३८५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.11.13 13:07:48 +05'30'

**म. भ. सावंत**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. मा.प्रधान सचिव, पाणी पुरवठा स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक,
९. उप सचिव /पापु-१४, पाणी पुरवठा स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक,
१०.विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
११.जिल्हाधिकारी, बीड.
१२.मुख्याधिकारी, अंबेजोगाई नगरपरिषद, जि. बीड.
१३.पापु-१४ संग्रहासाठी.